**जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्पातंर्गत प्रोत्साहनात्मक निधी (Incentive Fund) अंतर्गत औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध-पुणे येथे प्रस्तावित करण्यात आलेल्या रोबोटिक्स व मेकॅट्रॉनिक्स लॅब करीता यंत्रसामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रशामा-२८११/२०१७/प्र.क्र. १२०/व्यशि-२,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०९ ऑगस्ट, २०१७.

<u>वाचावे :-</u>

१. शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्रमांक:जाबॅप्र-२०११/(४९/११)/व्यशि-५, दिनांक ७ ऑगस्ट, २०१२.
२. शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक:-मंजूरी-२६११/२०१३/ प्र.क्र.१६२/ व्यशि-२, दिनांक १ फेंब्रुवारी, २०१४.
३. शासन निर्णय , कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, क्रमांक : मंजूरी-२६११/ २०१५/प्र.क्र.१६२/ व्यशि-२, दिनांक ०६ फेब्रुवारी, २०१६.
४. शासन निर्णय , कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, क्रमांक : प्रशामा-२८११/ २०१६/प्र.क्र.७३/व्यशि-२, दिनांक २७ सष्टेंबर, २०१६.
५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : १८/जाबँप्र/इन्सेंटिव्ह फंड/२०१७/९९, दिनांक २६.०७.२०१७.
६. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : १८/जाबँप्र/इन्सेंटिव्ह फंड/२०१७/१००, दिनांक ०३.०८.२०१७.

<u>**प्रस्तावना:-**</u>

"जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्प" या योजनेंतर्गत राज्यास प्राप्त झालेल्या प्रोत्साहनात्मक निधी (Incentive Fund) करीता एकूण ७ कामांसाठी येणाऱ्या रूपये ६४८.०० लाख इतक्या निधीस डी.जी.टी., नवी दिल्ली यांनी दिनांक ३१.०३.२०११ पत्रान्वये केन्द्र हिस्सा (७५%) रुपये ४८६.०० लाख पैकी रुपये २४३.०० लाख इतका निधी वितरीत केल्यानंतर, त्याबाबतच्या खर्चास उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक (१) च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली. तद्नुषंगाने, उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक (२) च्या शासन निर्णयान्वये जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्पांतर्गत प्रोत्साहनपर निधीमधून औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध, पुणे तसेच संचालनालयाच्या (SPIU) साठी आवश्यक यंत्र सामुग्रीची खरेदी करण्यासाठी एकूण रुपये २६८.३५ लक्ष (रुपये दोन कोटी अडुसष्ट लाख पस्तीस हजार फक्त) इतक्या खर्चास सन २०१३-१४ या वित्तीय वर्षाकरिता प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, Incentive Fund अंतर्गत औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध-पुणे येथे प्रस्तावित Robotics & Mechatronics Lab, E-

Studio, Manpower Excellence Center आणि Interactive Web Portal व State Level MIS याकरीता आवश्यक यंत्रसामुग्री/उपकरणे/सॉफ्टवेअर पॅकेजेस खरेदी होवू शकली नाही. दरम्यान, Robotics & Mechatronics Lab करीता आवश्यक यंत्रसामुग्री खरेदी करण्याकरीता वित्तीय वर्ष २०१२-१३ मध्ये निविदा प्रकाशित करण्यांत आली असता, आयोजित करण्यांत आलेल्या Pre-BID बैठकीमध्ये पुरवठादारांनी Specifications व Qualification Criteria बाबत काही मुद्दे उपस्थित करुन निविदा रद्द केली असल्याने, उपस्थित केलेल्या मुद्यांत आवश्यक ती सुधारणा करून वित्तीय वर्ष २०१३-१४ मध्ये निविदा नव्याने प्रकाशित करण्यांत आली. तथापि, पुरवठादारांनी पुन्हा काही मुद्दे उपस्थित करुन निविदा पुनःश्च रद्द केल्याने, तसेच विषयाधीन प्रकल्पास डी.जी.टी., नवी दिल्ली यांनी दिनांक ३० सप्टेंबर २०१६ पर्यंत नव्याने मुदतवाढ दिली असल्याने, संचालनालयाने Incentive Fund अंतर्गत औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध-पुणे येथे प्रस्तावित Robotics & Mechatronics Lab करिता सन २०१५-१६ मध्ये "यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" या उद्दिष्टाखाली रुपये १९०.०० लक्ष (रुपये एकशे नव्वद लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या खरेदीस "मागणी क्रमांक : डब्ल्यू-४, २२३०-कामगार व सेवायोजन" या लेखाशिर्षाखाली प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत कळविले. सदर खर्चास संदर्भ क्र ३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली. तथापि प्रशासकीय कारणास्तव सदर खरेदी होवू शकली नाही, त्यामुळे संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी केलेल्या विनंतीनुसार वरील संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ या वर्षात रू ६७.८४ लाख इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली. आता संचालनालयाने वरील संदर्भ क्र.६ येथील पत्रान्वये सन २०१६-१७ मध्ये मान्यता प्राप्त झालेल्या रू.६७.८४ लाख रकमेची Mechatronics Lab खरेदी करण्यात आलेली असून Robotics Lab खरेदीकरिता उर्वरित रूपये १२२.१६ लाख रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे. त्यानुषंगाने सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन आता याद्वारे, जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्पांतर्गत प्रोत्साहनपर निधीमधून, "औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध- पुणे" या संस्थेस Incentive Fund अंतर्गत Robotics Lab करीता "Industrial Robot ६ axis Robot १ नग आणि Required accessories" खरेदी करण्यासाठी रू.१२२.१६ लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

**अटी व शर्ती**

१. सदरची खरेदी जागतिक बँकेने घालून दिलेल्या नियमानुसार अत्यंत पारदर्शकपणे ई-टेंडर प्रक्रीया राबवून करण्यात येईल.

२. सदर खरेदी प्रक्रियेवेळी आवश्यक तेथे उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या क्रमांक: भांखस २०१४/प्र. क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि. ०१/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील विहित कार्यपध्दती, Manual of office procedure for purchase of stores by the Govt. departments याव्दारे विहित कार्यपध्दती, शासनाच्या माहिती व तंत्रज्ञान विभागाने या संबंधी

निर्गमित केलेले आदेश तसेच खरेदी संदर्भात शासनाने वेळोवेळी विहित केलेली कार्यपध्दती व नियमांचे आणि इतर सर्वसाधारण निर्देशांचे काटेकोर अनुपालन करण्यांत यावे. यामध्ये कोणतीही अनियमितता आढळल्यास त्याची जबाबदारी संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालये प्रमुख तसेच संबंधित संस्था प्रमुख यांची राहील.

३. संचालनालयाने संदर्भाधिन ६ येथील च्या पत्रान्वये शासनास सादर केल्यानुसारच Robotics Lab ची खरेदी करण्यात येईल. यावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांची राहील.

४. खरेदी करण्यात येणारी यंत्रसामुग्री व साधनसामुग्री ही विहित मानकानुसार गैरवाजवी (अधिक्य) होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

५. डी.जी.ई.टी., नवी दिल्ली व जागतिक बँक प्रकल्प, नवी दिल्ली यांनी Procurement Plan ला दिलेल्या मंजूरीनुसारच खरेदी प्रक्रिया राबविण्यासाठी आवश्यक ती खरेदी प्रक्रिया संचालनालय स्तरावरून करण्यात येईल.

६. प्रस्तूत बाबींच्या खरेदीसाठी आवश्यक असलेला निधी वितरीत करुन घेणे, आंहरीत करणे व सदर निधीचे संवितरण याबाबत नियमानुसार तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेश/सुचनांनुसार आवश्यक कार्यवाही संचालनालय स्तरावरुन करण्यात यावी. या अनुषंगाने वित्त विभाग परिपत्रक क्र. अंदाज-२०१४/प्र.क्र. ११०/अर्थ-३, दि. ०१/०७/२०१४ अन्वये वित्त विभागाने दिलेल्या सुचनांचे पालन करून त्यानुसार पुढील प्रक्रिया करण्याची जबाबदारी संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांची राहील.

७. खरेदी करण्यात येणारी सर्व यंत्रसामुग्री व साधनसामुग्री प्रत्यक्ष खरेदी करण्यापूर्वी तपासणी करून सदर तपासणीत ती योग्य असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करून घेण्यात यावे.

८. सदर यंत्रसामुग्री व साधनसामुग्री तांत्रिक विनिर्दिष्ठांप्रमाणे आहे असे तांत्रिक समितीचे प्रमाणपत्र घेण्यात यावे व ते योग्य असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय संबधितांना देयक अदा करण्यात येवू नये.

९. जागतिक बँक प्रकल्पाची अंतिम मुदत दि. ३०.०९.२०१७ पर्यंत असल्याने सदर खरेदी प्रक्रिया तात्काळ पूर्ण करून याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास तसेच राज्य शासनास विहित मर्यादेत सादर करण्याची दक्षता संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी घ्यावी.

१०. उपलब्ध आर्थिक तरतूदीपेक्षा अधिक रकमेच्या खरेदीचे आदेश निर्गमित करु नयेत.

११. केंद्र शासन व जागतिक बँकेच्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करून खरेदी संदर्भात जागतिक बँकेने विहित केलेल्या कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

१२. सदर खरेदीचा निर्णय हा केंद्र शासनाने विहित केलेल्या मानकानुसारच घेतला आहे याच्या अधिन ही मंजूरी देण्यात येत आहे.

१३. व्यवसाय अभ्यासक्रमाशी संबंधीत असलेले यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्याची दक्षता संचालनालयाने घ्यावी व नियमानुसार जेथे केंद्र शासनाची मान्यता आवश्यक असेल तेथे केंद्र शासनाची मान्यता प्राप्त झाल्यानंतरच खरेदी करण्यात यावी.

१४. जर प्रस्तुत यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी संदर्भात लेखा आक्षेप आल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी ही खरेदी प्रस्तावित करणाऱ्या अधिकाऱ्याची राहील.

१५. सदर खरेदी ही संचालनालय स्तरावरुन करण्यात येणार असल्याने संचालक,(व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई हे नियंत्रण अधिकारी म्हणून व संबंधित संस्थेचे प्राचार्य हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

१६. खरेदी करण्यात येणाऱ्या वस्तूंची नोंद जडवस्तूसंग्रह नोंदवहीत घेण्याबाबत नियमानुसार आवश्यक कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.

१७. शासनाची प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतर खरेदी प्रक्रियापूर्ण करून प्रत्यक्ष खर्चाचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात येईल.

१८. शासन पत्र उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.खरेदी-२०१५/(प्र.क्र.४५/१५)/तांशि-३, दि.३ जून, २०१५ अन्वये शासकीय संस्थांकरीता विविध उपकरणे, यंत्रसामुग्री इत्यादी खरेदी करण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्यासंदर्भात सर्व संचालकांना दिलेल्या सूचना विचारात घेऊन निविदा प्रक्रीया पूर्ण झाल्यानंतर वित्तीय नियमानुसार आवश्यक असलेले निधी वितरणाचे प्रस्ताव विभागाकडे मान्यतेसाठी पाठवावेत. त्याशिवाय कोणताही खर्च होणार नाही, याची दक्षता संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी घ्यावी.

१९. या प्रस्तावित खरेदीच्या प्रक्रियेसंदर्भातील अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

२. यासाठी होणारा खर्च राज्यहिस्सा (२५%) रुपये ३०.५४ लाख व केंद्रहिस्सा (७५%) रुपये ९१.६२ लाख असे एकूण १२२.१६ लक्ष (रुपये एक कोटी बावीस लाख सोळा हजार फक्त) असा राहील.

सदर रुपये १२२.१६ लाख रकमेचा खर्च मागणी क्र.झेडए- १, २२३०- कामगार व सेवायोजन, (०२)(०३) कारागिरांसाठी तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षणाचा विस्तार, (राज्यहिस्सा) (२२३० ए १५६)
५२, यंत्रसामुग्री व साधनसामुग्री. तसेच मागणी क्रमांक झेडए-१, २२३० -कामगार व सेवायोजन, (०२)(०४)- कारागिरांसाठी तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षणाचा विस्तार, (केंद्रहिस्सा)(२२३० ए १६५), ५२, यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०९१३०६२०११०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Namdeo Gite

Digitally signed by Ramesh Namdeo Gite
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3d393321776e432301afbfdc4e901e3512aed525312 19062a4a99ea7bd3ff104, cn=Ramesh Namdeo Gite
Date: 2017.08.09 12:57:00 +05'30'

**(रमेश ना. गिते)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण,प्रादेशिक कार्यालय, पुणे. (संचालनालयामार्फत)
३. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंध-पुणे. (संचालनालयामार्फत)
४. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१ /२ , मुंबई / नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व आज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
७. उपसंचालक, लेखा व कोषागारे, पुणे.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. उपकोषागार अधिकारी, पुणे
१०. कार्यासन अधिकारी (रोस्वरो-२), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (व्यशि-२ ), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.